ऊर्जा विभागांतर्गत विद्युत निरीक्षणालय शाखेतील पदांसाठी सार्वजनिक बांधकाम विभागाच्या विद्युत शाखेतील पदांचे सेवाप्रवेश नियम तात्पुरत्या स्वरुपात लागू करण्याबाबत -

**महाराष्ट्र शासन**

**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग**

**शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०१४/प्र.क्र.५८८/ऊर्जा-५**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

दिनांक : ०७ ऑक्टोबर, २०१५

**वाचा:-** १) शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग क्र. संकीर्ण-२०१४/प्र.क्र.५८८/ऊर्जा-२, दिनांक २६.२.२०१५

२) शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्र. मुअवि ००५/सी.आर.८९५७/ ऊर्जा-२, दिनांक २०.२.२००६

३) शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्र. संकीर्ण-२०१४/प्र.क्र. ५८८(१)/ ऊर्जा-२, दिनांक २४.४.२०१५

**शासन निर्णय :**

उपरोक्त क्रमांक (१) येथील दिनांक २६.२.२०१५ च्या शासन निर्णयान्वये विद्युत निरीक्षणालयाचे संपूर्ण कामकाज आस्थापनेसह ऊर्जा विभागाच्या अधिपत्याखाली आणण्यात आले आहे. यापूर्वी विद्युत निरीक्षणालयाच्या या विभागांतर्गत पदांवरील अधिकारी व कर्मचारी यांच्या नियुक्त्या, बदल्या, पदोन्नत्या, सेवाज्येष्ठता इत्यादी सर्व आस्थपनाविषयक बाबी सार्वजनिक बांधकाम विभागाकडून हाताळल्या जात होत्या. परंतु आता उपरोक्त शासन निर्णयान्वये या सर्व बाबी ऊर्जा विभागाच्या अखत्यारीत आल्या आहेत. त्यामुळे आता उपरोक्त क्रमांक (२) येथील शासन निर्णयान्वये विद्युत निरीक्षणालय शाखेसाठी पदांचा जो आकृतिबंध मंजूर करण्यात आला होता तो पुन्हा क्र.(३) येथील शासन निर्णयान्वये अस्तित्वात आला असून तो ऊर्जा विभागाच्या आस्थापनेवर यापुढे कार्यरत राहील.

२. विद्युत निरीक्षणालयाच्या आस्थापनाविषयक सर्व बाबी सार्वजनिक बांधकाम विभागाकडून ऊर्जा विभागाच्या अधिपत्याखाली आल्यामुळे सार्वजनिक बांधकाम विभागाकडून संबंधित कर्मचा-यांच्या सेवाविषयक सर्व नस्ती, कागदपत्रे, अभिलेख (पदोन्नती, सेवा ज्येष्ठता, विभागीय चौकशी, इ. सर्व प्रकरणे) ऊर्जा विभागाकडे हस्तांतरीत करण्याची प्रक्रीया सुरु आहे. या विभागाच्या अखत्यारीत आलेल्या काही अधिकारी / कर्मचारी यांच्या सेवाविषयक बाबी, उदा. पदोन्नती, सेवा ज्येष्ठता यादी तयार करणे, निवड सूची तयार करणे, इत्यादींची कार्यवाही सुरु आहे. परंतु सदर पदांचे सेवाप्रवेश नियम सध्या ऊर्जा विभागात अस्तित्वात नसल्याने त्या पदांसाठी नवीन सेवाप्रवेश

नियम तयार करण्याची कार्यवाही विचाराधीन आहे. परंतु नवीन सेवाप्रवेश नियम अस्तित्वात येईपर्यंत सेवाविषयक प्रकरणांवरील कार्यवाही थांबविता येणार नाही. या कारणास्तव ऊर्जा विभागाकडून नवीन सेवा प्रवेश नियम अस्तित्वात येईपर्यंत, सार्वजनिक बांधकाम विभागाच्या विद्युत शाखेचे जे सेवाप्रवेश नियम संबंधित अधिकारी / कर्मचारी यांना यापूर्वी लागू होते ते सेवाप्रवेश नियम त्यांना सद्य:स्थितीत लागू राहतील.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१५१००७१७३०२६०८१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Bhimashankar Yallapa Manta

Digitally signed by Bhimashankar Yallapa Manta
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400051, st=Maharashtra, cn=Bhimashankar Yallapa Manta
Date: 2015.10.07 17:31:51 +05'30'

(भि. य. मंता)

उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
२) मा. मंत्री (ऊर्जा) यांचे खाजगी सचिव
३) मा. मंत्री (सार्वजनिक बांधकाम) यांचे खाजगी सचिव
४) मा. विरोधी पक्ष नेता, विधानसभा / विधानपरिषद, विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई
५) अपर मुख्य सचिव (सार्वजनिक बांधकाम) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
६) प्रधान सचिव (सामान्य प्रशासन) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
७) प्रभारी मुख्य विद्युत निरीक्षक, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, चेंबूर, मुंबई
८) अधिक्षक अभियंता, प्रादेशिक विद्युत निरीक्षण मंडळ, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मुंबई/पुणे/औरंगाबाद/नागपूर
९) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता),
१०) महाराष्ट्र-१, मुंबई/महाराष्ट्र-२, नागपूर
११) महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई / महाराष्ट्र-२, नागपूर
१२) सर्व विद्युत निरीक्षक, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, चेंबूर, मुंबई
१३) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१४) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
१५) सर्व जिल्हाकोषाधिकारी
१६) सर्व कार्यासने (ऊर्जा उपविभाग), मंत्रालय, मुंबई-४०००३२.
१७) निवड नस्ती -ऊर्जा-५.